**केंद्र शासनाने मंजूरी दिलेल्यापैकी अद्याप सुरु न झालेली ९८ अंगणवाडी केंद्र व ७८५ मिनी अंगणवाडी केंद्र सुरु करण्यास व त्यामधील अंगणवाडी सेविका / मिनी अंगणवाडी सेविका / मदतनीस याची रिक्त पदे भरण्यास मंजूरी देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एबावि-२०१९/प्र.क्र.३०५/का.६**
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- १७ जानेवारी, २०२०

**वाचा :** - (१) महिला व बाल विकास विभाग,शा.नि.क्र. एबावि-२०१२/प्र.क्र.४२९/का.६, दिनांक १३ ऑगस्ट २०१४
(२) महिला व बाल विकास विभाग,शा.नि.क्र. एबावि-२०१६/प्र.क्र.२३०/का.६, दिनांक २२ सप्टेंबर २०१६
(३) महिला व बाल विकास विभाग,पत्र.क्र.एबावि-२०१६/प्र.क्र.१८०/का.६, दिनांक ७ सप्टेंबर २०१७
(४) आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांचे पत्र क्र.एबाविसेयो/ सनियंत्रण/२०१८-१९/१४९८, दिनांक ३०/०३/२०१९
(५) मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली गठीत केलेल्या राज्य शक्ती प्रदान कार्यक्रम समितीची दिनांक २०/१२/२०१९ रोजी आयोजित बैठकीचे इतिवृत्त.

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाने महाराष्ट्र राज्यात ९७४७५ अंगणवाडी केंद्र व १३०११ मिनी अंगणवाडी केंद्र अशी एकूण ११०४८६ इतकी अंगणवाडी केंद्र मंजूर केलेली असून त्यापैकी ९७३७७ अंगणवाडी केंद्र व १२२२६ मिनी अंगणवाडी केंद्र अशी एकूण १०९६०३ एवढी अंगणवाडी केंद्र प्रत्यक्षात कार्यान्वित झालेली आहेत. त्यामुळे उर्वरित ९८ अंगणवाडी केंद्र व ७८५ मिनी अंगणवाडी केंद्र अशी एकूण ८८३ इतकी अंगणवाडी केंद्र सुरु करण्यास परवानगी देण्याबाबतचा प्रस्ताव आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांनी संदर्भाधिन क्र.४ येथील दिनांक ३०/०३/२०१९ च्या पत्रान्वये शासनास सादर केला होता.

२. एकात्मिक बाल विकास सेवा योजनेअंतर्गत राज्यातील अंगणवाडयांची सुधारित संख्या निश्चित होईपर्यंत अंगणवाडी सेविका, मिनी अंगणवाडी सेविका व मदतनीस यांच्या रिक्त जागा भरण्यात येऊ नयेत. तसेच अल्प उपस्थितीच्या अंगणवाडयांची एकत्रिकरण करण्याच्या अनुषंगाने विभागाने कार्यवाही करावी, अशा वित्त विभागाने सूचना दिल्या होत्या. त्याअनुषंगाने मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली गठीत केलेल्या राज्य शक्ती प्रदान कार्यक्रम समिती समोर रिक्त पदांची भरती करण्यास परवानगी देण्याबाबतचा प्रस्ताव सादर करण्यात आला होता. सदर प्रस्तावा समवेत वरीलप्रमाणे कार्यन्वित करावयाच्या ९८ अंगणवाडी केंद्र व ७८५ मिनी अंगणवाडी केंद्र मधील अंगणवाडी सेविका, मदतनीस व मिनी अंगणवाडी सेविका यांची पदांची भरती करण्याबाबतचा प्रस्ताव सादर करण्यात आला असता सदर समितीने त्यास मान्यता दिलेली आहे. त्याअनुषंगाने सदर अंगणवाडी केंद्र व मिनी अंगणवाडी केंद्र सुरु करण्यास व तेथील पद भरती करण्यास परवानगी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

एकात्मिक बाल विकास सेवा योजनेची प्रभावी अंमलबजावणी होण्याच्या अनुषंगाने केंद्र शासनाने मंजूरी दिलेल्या परंतु कार्यान्वित न झालेल्या ९८ अंगणवाडी केंद्र व ७८५ मिनी अंगणवाडी केंद्र सुरु करण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे. तसेच या अंगणवाडी केंद्रांमधील अंगणवाडी सेविका, मदतनीस व मिनी अंगणवाडी सेविका यांची पद भरती खालील अटी व शर्तीच्या अधिन राहून करण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

**अटी व शर्ती :-**

१. अंगणवाडी सेविका, मदतनीस व मिनी अंगणवाडी सेविका यांची रिक्त पदे भरताना शासनाच्या दिनांक १३ ऑगस्ट २०१४ च्या शासन निर्णयातील व दिनांक २२ सप्टेंबर २०१६ च्या शासन निर्णयातील कार्यपध्दतीचे तंतोतंत पालन करण्यात यावे.

२. अंगणवाडी सेविका / मदतनीस / मिनी अंगणवाडी सेविका यांच्या मानधनी सेवा भरती प्रक्रियेत शासनाने वेळोवेळी केलेल्या सुधारणा नव्याने भरती केलेल्या सर्व सेविकांना लागु रहातील.

३. उपरोक्त सूचनांची तंतोतंत अंमलबजावणी होत असल्याची खातरजमा आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांनी घ्यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००११७१०५८२६०३३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Lalsing
Ramchandra Gujar

Digitally signed by Lalsing Ramchandra Gujar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Women And Child Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c3eb5f6c3e4855c5793924cf2a352b44266d360de02a2494e1a64477bf79d694, serialNumber=4ca059ab7b8d64aaf749fe58e0a714a015f521cb28fd2204e49a4d81f12a5745, cn=Lalsing Ramchandra Gujar
Date: 2020.01.20 12:20:16 +05'30'

**(ला.रा.गुजर )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मंत्री, महिला व बाल विकास, मंत्रालय, मुंबई यांचे खाजगी सचिव
२. मा. राज्यमंत्री, महिला व बाल विकास, मंत्रालय, मुंबई यांचे खाजगी सचिव
३. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक
४. अपर मुख्य सचिव (नियोजन) नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
५. अपर मुख्य सचिव (वित्त) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
६. अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
७. प्रधान सचिव (वित्तीय सुधारणा),वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
८. प्रधान सचिव (आदिवासी विकास) आदिवासी विकास विभाग,मंत्रालय,मुंबई
९. प्रधान सचिव-२, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१०. प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई
११. सचिव, ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई
१२. सचिव, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१३. आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई
१४. आयुक्त, महिला व बाल विकास, महाराष्ट्र राज्य, पुणे
१५. महासंचालक, माहिती व प्रसिध्दी, मंत्रालय, मुंबई

१६. सर्व विभागीय आयुक्त
१७. सर्व जिल्हाधिकारी
१८. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
१९. सर्व महानगरपालिका आयुक्त, महानगरपालिका
२०. सर्व विभागीय उपायुक्त, महिला व बाल विकास विभाग
२१. सर्व जिल्हा कार्यक्रम अधिकारी (महिला व बाल विकास) जिल्हा परिषद
२२. सर्व बाल विकास प्रकल्प अधिकारी (नागरी/ग्रामीण/आदिवासी)
२३. सर्व मुख्याधिकारी, नगरपालिका,
२४. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) (लेखापरिक्षा), महाराष्ट्र मुंबई / नागपूर
२५. महासंचालक, राजमाता जिजाऊ माता-बाल आरोग्य व पोषण मिशन, मुंबई
२६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
२७. निवासी लेखा परिक्षा अधिकारी मुंबई
२८. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
२९. निवड नस्ती/ कार्यासन-६